**फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरून शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून विद्यमान संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरू करणे तसेच, संस्थेच्या नावात बदल करण्यास करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२४/प्र.क्र.१४१/तांशि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० जुलै, २०२४.

**वाचा** : संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/पीसीआय-मान्यता/२०२४/४००, दि.२०.०६.२०२४.

**प्रस्तावना** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून विद्यमान संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरू करणे तसेच, विद्यमान संस्थेच्या नावात बदल करण्यास, कायम विनाअनुदानित तत्वावर शासन मान्यता देण्याबाबत संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन पत्रांन्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

**शासन निर्णय** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ मध्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्यानुसार, सोबतच्या Annexure - A व B मध्ये नमूद संस्थांना, फार्मसी कौसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्याकडून शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करिता देण्यात येणाऱ्या मान्यतेच्या Extension of Approval (EoA) अधिन राहून, शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून विद्यमान संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरू करणे तसेच, विद्यमान संस्थेच्या नावात बदल करण्यास, प्रचलित अटी व शर्तींच्या अधीन राहून कायम विनाअनुदानित तत्वावर शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रस्ताव | सहपत्र |
|---|---|---|
| ०१ | राज्यातील ३ विद्यमान औषधनिर्माणशास्त्र संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | Annexure - A |
| ०२ | राज्यातील १ संस्थेच्या नावात बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे. | Annexure - B |

२. तसेच, उपरोक्त Annexure - A नुसार मान्यता दिलेल्या संस्थांमधील प्रथम वर्षाचे प्रवेश, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून करण्यास प्रचलित अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती:-**

१) सदर मान्यता ही कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) सदर संस्थांना शासनाची मान्यता शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून दिली असली तरी, त्यांनी शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून प्रथम वर्षाचे प्रवेश करणे आवश्यक राहील. तत्पूर्वी, संबंधित संस्थांकडे शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करिताची फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांची मान्यता Extension of Approval (EoA) असणे बंधनकारक राहील.

३) प्रस्तुत बाबतीत फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

४) सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता सोबतच्या Annexure - A मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

५) शासनाने विहित केलेल्या तसेच फार्मसी कॉन्सिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस, संचालक, तंत्र शिक्षण यांच्यासोबत करारनामा करावा लागेल. तसेच, आवश्यक कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

६) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

७) सदर अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

८) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास, त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षक, शिक्षकेतर व इतर तांत्रिक कर्मचारी, फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या निकषाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. वेतन व भत्ते इ. बाबत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकडून तसेच, संस्थेविरुध्द विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१०) संस्थेने आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके फार्मसी कौंसिल ऑफ इंडियाच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, फार्मसी कौंसिल ऑफ इंडियाच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

११) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संस्थेवर बंधनकारक राहतील.

३. ज्या संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थेकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी व पुढील आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१०१८४४४२५९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: CN = SHAHAJAHAN SHAKUR MULANI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2024.07.10 18:56:12 +05'30'

**( शहाजहान मुलाणी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई.
३) सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालये (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) सर्व अकृषि विद्यापीठांचे कुलसचिव (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
६) संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
७) निवड नस्ती/तांशि-४

# Annexure A

Higher and Technical Education Dept. G.R.No.Manyata-2024/C.R.141/TE-4, Dated- 10th July, 2024.

List of New Course in intake in existing Unaided Pharmacy Institute, Approved by PCI from A.Y. 2023-24

| SR. NO. | DTE CODE | PCI CODE | INSTITUTE NAME | STATUS | PROGRAMME | LEVEL OF COURSE | MAIN COURSE NAME | COURSE NAME | UNIVERSITY NAME | APPROVED INTAKE A.Y. 2022-23 | INTAKE APPROVED BY PCI A.Y.2023-24 | VARIATION |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2589 | PCI-3312 | Shri Sai Janvikas Pratishthan's Ojas College of Pharmacy, Rohanwadi (Ambewadi), Tal. & Dist.Jalna-431203 | Un-Aided | PHARMACY | POST GRADUATE | Master of Pharmacy | Pharmacology | Dr.Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | 0 | 9 | 9 |
| | | | | | | POST GRADUATE | Master of Pharmacy | Pharmaceutics | Dr.Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | 0 | 9 | 9 |
| 2 | 1136 | PCI-878 | Indira Bahuuddeshiya Shikshan Sanstha's Dr.Rajendra Gode College of Pharmacy, Malkapur Buldana Road, Malkapur, Dist.Buldana | Un-Aided | PHARMACY | POST GRADUATE | Master of Pharmacy | Pharmaceutical Chemistry | Sant Gadgebaba Amravati University, Amravati | 0 | 15 | 15 |
| 3 | 5264 | PCI-1236 | Adivasi Seva Samiti's Institute of Industrial and Pharmaceutical Technology, Panchavati, Nashik | Un-Aided | PHARMACY | UNDER GRADUATE | Bachelor of Pharmacy | Pharmacy | Dr.Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | 0 | 60 | 60 |

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: CN = SHAHAJAHAN SHAKUR MULANI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2024.07.10 18:57:17 +05'30'

**Annexure B**

Higher and Technical Education Dept. G.R.No.Manyata-2024/C.R.141/TE-4, Dated- 10th July, 2024.

List of Change in Name of Institute Approved by PCI from A.Y. 2023-24

| SR. NO. | PCI CODE | Institute CODE | Old Name of Institution | New Name of the Instiutte | Institute Address |
|---|---|---|---|---|---|
| 1 | PCI-172 | 4270 | B C Y R C Institute of Diploma in Pharamacy, Opposite Telephone Exchange, Nandavan, Nagpur | Backward Class Youth Relief Committee's KDK College of Pharmacy and Research Institute, Nagpur | KDK College of Engineering Campus, Great Nag Road, Nandanvan, Nagpur - 440 009 |

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: CN = SHAHAJAHAN SHAKUR MULANI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2024.07.10 18:57:31 +05'30'